**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त राज्य व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या आस्थापनेवरील गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील पदोन्नतीसाठी शिफ़ारस करण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्याबाबत....**



**महाराष्ट्र शासन**

**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.:-ग्रासंअ-०७२४/प्र.क्र.६३/ग्रासं-४**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- १४ जुलै ,२०२४.

**वाचा:-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र:एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/ का.१२, दि.०१.०८.२०१९.

२. अ.ना.पु.व ग्रा.सं.वि शासन निर्णय क्र.संकीर्ण२०१७/प्र.क्र.१५६/नापु-१२, दि.१८.०४.२०२२

**प्रस्तावना :**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखाली राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग कार्यरत आहेत. राज्य व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या आस्थापनेवरील गट- अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी व कर्मचारी यांचे सेवाप्रवेश नियमानुसार निवडसूची तयार करणेसाठी विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. राज्यातील राज्य व जिल्हा ग्राहक संरक्षण आयोगाच्या आस्थापनेवरील गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांचे सेवाप्रवेश नियमानुसार पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करणेस्तव विभागीय पदोन्नती समिती गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**राज्य व जिल्हा ग्राहक संरक्षण आयोगातील गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीस्तव विभागीय पदोन्नती समिती**

| अ.क्र. | विभागातील अधिकाऱ्यांचे पद | विभागीय पदोन्नती समितीतील पद |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव ,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | सह सचिव/उप सचिव (ग्रासं-४) | सदस्य |
| ४. | अवर सचिव/कार्यासन अधिकारी (ग्रासं-४) | सदस्य सचिव |
| ३. | विभागातील मागासवर्गीय प्रतिनिधी समितीतील अध्यक्षांच्या सहमतीने | मागासवर्गीय प्रतिनिधी तथा सदस्य |
| ५. | प्रबंधक (प्रशासन),राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग , मुंबई | सदस्य |

३. सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १.८.२०१९ च्या शासन निर्णयात नमूद केलेप्रमाणे विभागीय पदोन्नती समितीमध्ये मागास प्रवर्गाकरिता प्रतिनिधित्व करणारा एक सदस्य असावा. असा सदस्य नसल्यास, समितीच्या अध्यक्षांच्या सहमतीने मागास प्रवर्गाचे प्रतिनिधीत्व करण्याकरीता एका अधिकाऱ्याचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करावा.

४. उपरोक्त पदोन्नती समिती या आदेशाच्या दिनांकापासून अमंलात येतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१४१२११५३५६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.08.14 16:03:31 +05'30'

**( राजश्री सारंग )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

- प्रधान सचिव ,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
- उपसचिव , अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
- अवर सचिव(ग्रासं-४), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
- प्रबंधक,राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- कार्यासन अधिकारी(कार्या-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती(ग्रासं-४).